सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद,
या कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू
ठेवण्यासाठी मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक:एसपीआय-२०१०/प्र.क्र.१२/का.२८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च,२०१०.

वाचा: १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीआय-२००३/५४६/प्र.क्र.१०६/२००३/२८, दिनांक : ६/८/२००४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर,२००४.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीआय-२००७/२५०५/प्र.क्र.२०८/२००७/२८, दिनांक : २२.५.२००८.
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:एसपीआय-२००८/१८२१/(प्रक्र.३७८/२००८)/२८, दिनांक : २१/३/२००९
५) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद यांचे पत्र क्र.१००२/एसपीआय-१/४५०३, दिनांक ३१/१२/२००९.

शासन निर्णय :-

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद या कार्यालयातील मंजूर २४ पदांचा पदविषयक सुधारीत आकृतिबंध शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०६.०८.२००४ अन्वये निर्गमित करण्यात आला आहे. तसेच या अनुषंगाने शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २२.०५.२००८ अन्वये उपरोक्त नमूद २४ पदांपैकी १९ पदे पुढील ३ वर्षाकरिता स्थायी करण्यात आली असून उर्वरित ५ अस्थायी पदांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसपीआय-२००८/१८२१/(प्रक्र.३७८/२००८)/२८, दिनांक २१.०३.२००९ अन्वये दिनांक ०१.०३.२००९ ते २८.०२.२०१० पर्यत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सोबतच्या परिशिष्टातील एकूण ५ अस्थायी पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत व ती यापुढेही चालू ठेवणे आवश्यक असल्याचे संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांनी दिनांक ३१/१२/२००९ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सदर ५ अस्थायी पदे दिनांक ०१.०२.२०१० दिनांक २८.०२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक-ए ५, लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (२००) इतर कार्यक्रम (००)(०५) सेवा पूर्वाध्ययन संस्था (२२३५००७ १) योजनेतर" याखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्रक्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४.१०.२००४अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००३१११३०७३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(अ.द.जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

सहपत्र : परिशिष्ट

प्रति,

संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको एन १२, सेक्टर-३ ,
मौलाना आझाद कॉलेजच्या मागे, नवीन औरंगाबाद - ४३१ ००३,
महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल - १ (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई ,
महालेखापाल - २ (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय,औरंगाबाद,
सामान्य प्रशासन विभागे, कार्या - २५,
निवड नस्ती ( २ प्रती ).